अधिव्याख्याता, धातुशास्त्र, शासकीय तंत्रनिकेतन, महाराष्ट्र तंत्रनिकेतन शिक्षक सेवा गट-अ पदावर नामनिर्देशनाने नियुक्तीबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : ससेनि-३२१७/प्र.क्र.६७/१७/तांशि-७**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक : २९ ऑगस्ट, २०१७.

**संदर्भ :** १) सामान्य प्रशासन विभाग अधिसुचना दि. १५ जून, २०१७.
२) महाराष्ट्र लोकसेवा आयोगाचे पत्र क्र.१५ (२) (३८)/५५३/सात-अ, दि. ०३ मे, २०१७.
३) संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य मुंबई, यांचे पत्र क्र. ४अ/आस्था/२०१७/४९९, दि. २० जून २०१७.

**शासन निर्णय :**

महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने संदर्भाधिन क्र.२ च्या पत्राव्दारे एकूण २ उमेदवारांची अधिव्याख्याता, धातुशास्त्र, शासकीय तंत्रनिकेतन, महाराष्ट्र तंत्रनिकेतन शिक्षक सेवा गट-अ या पदावर नियुक्तीसाठी शिफारस केली आहे. त्यापैकी खालील उमेदवाराची त्याच्या नावासमोर रकाना क्र.०६ मध्ये दर्शविलेल्या ठिकाणी ते ज्या दिनांकास त्यांच्या पदाचा कार्यभार स्विकारतील त्या दिनांकापासून ०२ वर्षांच्या परिविक्षा कालावधीसाठी स्थानापन्न नियुक्ती करण्यात येत आहे.

| गुण. क्र. | आयोग पुरस्कृत उमेदवाराचे नाव | वर्गवारी | आयोगाने शिफ़ारस केलेली वर्गवारी | दि.१५ जून, २०१७ च्या अधिसुचनेनुसार वाटप केलेला महसुली विभाग | नियुक्तीचे ठिकाण | ज्या अटींच्या अधिन राहून नियुक्ती देण्यात आली त्या अटी |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| १ | श्री. बोरसे कुणाल जयप्रकाश | भ.ज (क) (नॉन क्रेमिलेयर नाही) | खुला | पुणे | शासकीय तंत्रनिकेतन, कोल्हापूर | सगणक हाताळणी / वापराबाबतचे प्रमाणपत्र व चारित्र्य पडताळणी अहवाल सादर करण्याच्या अटीस अधिन राहून |

**०२.** उपरोक्त उमेदवारास संबंधित वैद्यकीय मंडळाने वैद्यकीय दृष्ट्या शासकीय सेवेसाठी पात्र ठरविले आहे. तशी नोंद त्यांच्या सेवा पुस्तकात घेण्यात यावी.

**०३.** उपरोक्त उमेदवाराची चारित्र्य पडताळणी अहवाल अप्राप्त आहे . सदर उमेवारानी सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.चापअ-१००८/ प्र.क्र.२१४/०८/१६-अ, दि.०९ जानेवारी, २००९ नुसार चारित्र्य व पुर्व चारित्र्य पडताळणी प्रमाणपत्र नियुक्ती आदेशापासून सहा महिन्यांच्या आत सादर करणे आवश्यक आहे. जर सदर प्रमाणपत्रे त्यांनी विहीत मुदतीत सादर केले नाही तर उक्त कालावधी संपताच त्यांची सदर पदावरील नियुक्ती आपोआप संपुष्टात येईल. सदर उमेदवारांची नियुक्ती ही निव्वळ तात्पुरत्या स्वरूपाची असून त्यांच्या चारित्र्य पडताळणीचा अहवाल असमाधानकारक असल्याचे निर्दशनास आल्यास त्यांची नियुक्ती कोणतेही कारण न देता एक महिन्याची नोटीस देवून समाप्त करण्यात येईल.

०४. उपरोक्त उमेदवाराची अधिव्याख्याता, धातुशास्त्र, शासकीय तंत्रनिकेतन, महाराष्ट्र तंत्रनिकेतन शिक्षक सेवा गट-अ या पदावर ते प्रत्यक्ष हजर झाल्याच्या दिनांकापासून, नामनिर्देशनाने निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात खालील अटी व शर्तींच्या अधिन राहून नियुक्ती करण्यात येत आहे :-

१) सदर उमदेवाराची वेतनश्रेणी-१५६००-३९१०० या पे बॅण्ड व उच्च व तंत्रशिक्षण विभाग, शासन निर्णय क्र.एसपीसी-२०१०/(३४/१०)/तांशि-२, दि.२०/०८/२०१० मध्ये नमूद एजीपी मध्ये राहील.

२) सदर वेतनश्रेणीव्यतिरिक्त शासन वेळोवेळी ठरवेल त्या दराने महागाई भत्ता, घरभाडे भत्ता व स्थानिक पुरक भत्ता अनुज्ञेय राहील.

३) सदर उमेदवारास प्रथम वेतनवाढ परिविक्षा कालावधीतील एक वर्ष पूर्ण झाल्यानंतर देण्यात येईल व त्यानंतरची वेतनवाढ परिविक्षा कालावधी समाधानकारक रित्या पूर्ण केल्यानंतर मिळेल.

४) सदर उमेदवाराचे परिविक्षा कालावधीतील काम किंवा वर्तणूक अयोग्य, अपेक्षित दर्जाची नसल्यास अथवा असमाधानकारक आढळल्यास त्यांची सेवा कोणतीही पूर्वसूचना न देता समाप्त करण्यात येईल अथवा सेवेतून कमी करण्यास ते पात्र ठरतील.

५) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.प्रशिक्षण-२०००/प्र.क्र.६१/२००१/३९, दि.०७/०८/२००१ अन्वये शासन सेवेतील नियुक्तीकरीता संगणक हाताळणी/वापराबाबतचे ज्ञान एक आवश्यक अर्हता म्हणून निश्चित करण्यात आली आहे. त्यानुसार शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.प्रशिक्षण-२०००/प्र.क्र.६१/२००१/३९, दि.१९/०३/२००३ अन्वये आवश्यक प्रमाणपत्र नियुक्ती आदेशाच्या दिनांकापासून ०२ वर्षांच्या आत उपलब्ध करुन देणे आवश्यक आहे. जर त्यांनी विहीत मुदतीत प्रमाणपत्र उपलब्ध करुन दिले नाही, तर उक्त कालावधी संपताच सदर पदावरील त्यांच्या सेवा कोणतीही पूर्व सूचना न देता समाप्त करण्यात येतील.

६) शिफारसपात्र मागासवर्गीय उमेदवाराचे जाती विषयक दावे संचालक, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्याकडून / संबंधित प्राधिका-याकडून तपासून घेण्यात यावेत.

७) सदर उमदेवाराची नियुक्ती सरळसेवा प्रवेश नियुक्तीसाठी विहीत केलेल्या नियमांच्या अधीन राहून ते यापूर्वी हिंदी व मराठी भाषेच्या परीक्षा उत्तीर्ण झालेले नसल्यास किंवा त्या परीक्षा उत्तीर्ण होण्यापासून सुट मिळाली नसल्यास त्या परीक्षा त्यांना विहीत मुदतीत उत्तीर्ण होणे आवश्यक आहे. तसे न झाल्यास त्यांची वेतनवाढ रोखून ठेवण्यात येईल.

८) सदर उमेदवाराचे वेतन महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन), नियम -१९८१ मधील तरतुदींनुसार निश्चित करण्यात यावे.

९) परिच्छेद ०१ मध्ये नमूद केलेल्या उमेदवाराने त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या ठिकाणी आदेशाच्या दिनांकापासून ०१ महिन्याच्या आत तात्काळ रुजु व्हावे. सदर विहीत मुदतीत जर त्यांनी नियुक्ती स्विकारली नाही तर आयोगाने घेतलेल्या परीक्षेत त्यांनी मिळवलेल्या गुणवत्ता क्रमानुसार त्यांना अनुज्ञेय असलेली ज्येष्ठता मिळणार नाही. शिवाय नियुक्तीच्या संदर्भात त्यांनी वरील मुदतीत शासनास काहीही कळविले नाही, तर कोणतीही पूर्वसूचना न देता त्यांच्या नियुक्तीचे सदर आदेश रद्द करण्यात येतील.

१०) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.अंनियो-१००९/प्र.क्र.३२/सेवा-४, दि.१८/०८/२००९ मधील तरतुदींनुसार दि. ०१ नोव्हेंबर, २००५ पूर्वी शासन सेवेत निवृत्ती वेतनार्ह आस्थापनेवर कार्यरत असलेल्या शासकीय कर्मचाऱ्याने त्याच किंवा अन्य विभागातील निवृत्ती वेतनार्ह आस्थापनेच्या पदावरील नियुक्तीसाठी दि.०१ नोव्हेंबर, २००५ पूर्वी किंवा त्यानंतर अर्ज केला असेल आणि त्याला दि. ०१ नोव्हेंबर, २००५ रोजी किंवा त्यानंतर नवीन पदावर नियुक्त करण्यात आले असेल अशा प्रकरणी शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.अंनियो-१००६/८७/सेवा-४, दि.१२ जानेवारी, २००७ मधील (i) ते (iv) येथे नमूद केलेल्या सर्व अटींची पूर्तता झाल्यास संबंधित शासकीय कर्मचाऱ्यास

महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन), नियम, १९८२ व सर्वसाधारण भविष्य निर्वाह निधी योजना लागू ठरतील. दि.१८/०८/२००९ च्या परित्रकात नमूद(i) ते (iv) येथील सर्व अटींची पूर्तता ज्या प्रकरणी होत नसेल, अशा शासकीय कर्मचाऱ्यास नवीन राष्ट्रीय निवृत्ती वेतन योजना लागू ठरतील.

११) सदर उमदेवाराचे सेवानिवृत्तीचे वय प्रचलित नियमानुसार राहील.

१२) उमेदवारास नियुक्तीच्या ठिकाणी उपस्थित राहण्यासाठी प्रवासभत्ता देण्यात येणार नाही.

१३) सदर उमेदवाराने नोकरी सोडण्यापूर्वी शासनास एक महिन्याची पूर्वसूचना देणे अथवा एक महिन्याचे वेतन देणे आवश्यक आहे.

**०५.** सदर नियुक्ती उमेदवाराने सादर केलेल्या प्रमाणपत्रांच्या सत्यासत्यतेवर अवलंबून राहील. सदर प्रमाणपत्र नियुक्तीनंतर खोटे अथवा बनावट आढळल्यास सदर उमेदवाराची नियुक्ती आपोआप संपुष्टात येईल.

**०६.** प्रस्तुत पदाच्या नियुक्ती न्यायालयांमध्ये उमेदवारांकडून दाखल झालेल्या न्यायालयीन प्रकरणांवरील अंतिम आदेशाच्या अधिन राहून आणि मा.उच्च न्यायालय, मुंबई येथे दाखल झालेल्या रिट याचिका क्रमांक ३१५१/२०१४ श्री. संजित शुक्ला विरूध्द महाराष्ट्र शासन व इतर सलग्नं याचिका या प्रकरणी होणा-या अंतिम निर्णयाच्या अधीन राहून करण्यात येत आहे.

**०७.** हे आदेश प्राप्त होताच संबंधित उमेदवाराने नियुक्तीच्या ठिकाणी हजर व्हावे व त्याबाबतचा अहवाल संबंधित संस्थाप्रमुखांकडे सादर करावा. संस्था प्रमुखांनी त्याबाबतचा अहवाल संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय यांच्यामार्फत शासनास सादर करावा.

**०८.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०१७०८२९११४०२१३५०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sudhir Jaya Shetty

Digitally signed by Sudhir Jaya Shetty
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher And Technical Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=72ea277025fdf5a4898b244953b82406eea05963bc456f1e1e8621e5917d8305, serialNumber=e9d37d499a521b728aeb3dc8ec38b759420308b9fd7816002b4af0ffbf1111d7, cn=Sudhir Jaya Shetty
Date: 2017.08.29 11:30:54 +05'30'

**( सुधीर जया शेट्टी )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

संबंधित उमेदवार (ई-मेलव्दारे).

**प्रत :**

१) संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य मुंबई.

२) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राव्दारे).

३) मा. मंत्री उच्च व तंत्रशिक्षण, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

४) मा. राज्यमंत्री उच्च व तंत्रशिक्षण, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

५) अपर मुख्य सचिव, उच्च व तंत्रशिक्षण, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.

६) सहसंचालक, तंत्रशिक्षण विभागीय कार्यालय, पुणे (तंत्रशिक्षण संचालनालयामार्फत).

७) प्राचार्य, शासकीय तंत्रनिकेतन, कोल्हापूर (तंत्रशिक्षण संचालनालयामार्फत).

(वरील उमेदवारांना रुजु करुन घेताना त्यांच्या शैक्षणिक तसेच इतर मूळ प्रमाणपत्रांची तपासणी करुन संस्था प्रमुखांनी स्वत: खात्री करावी व सदर उमेदवारांना हजर करुन घ्यावे आणि त्याबाबतचा अहवाल संचालक, तंत्रशिक्षण, मुंबई यांच्यामार्फत शासनास तात्काळ सादर करावा. तसेच संबंधित संस्थाप्रमुखांनी या आदेशातील ज्या उमेदवारांची नियुक्ती अटींच्या अधीन राहून केली आहे त्या उमेदवारांकडून विहीत मुदतीत या अटींची पूर्तता करुन घेवून त्याबाबतचा कार्यपूर्तता अहवाल संचालक, तंत्रशिक्षण, मुंबई यांच्यामार्फत शासनास तात्काळ सादर करावा.)

८) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखापरीक्षा) महाराष्ट्र-१, मुंबई.

९) जिल्हा कोषागार अधिकारी, कोल्हापूर.

१०) निवड नस्ती (तांशि-७).